जीएसटी अंमलबजावणीनंतर शासकीय कंत्राटात होणारा बदल.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन परिपत्रक क्रमांक :जीएसटी-१०१७/प्र.क्र.८१/कराधान-१
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १९ ऑगस्ट, २०१७

# प रि प त्र क

जीएसटीची अंमलबजावणी दिनांक १ जुलै २०१७ पासून सुरु करण्यात आली आहे. जीएसटीच्या अंमलबजावणीमुळे शासकीय कंत्राटावर कराच्या बदललेल्या कररचनेमुळे परिणाम होणार आहे. या संदर्भात खालील मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत :-

१) <u>दिनांक २२ ऑगस्ट २०१७ नंतर काढण्यात येणारी कंत्राटे :</u>

दिनांक १ जुलै २०१७ पासून देण्यात येणाऱ्या विविध शासकीय कंत्राटावर जीएसटी अधिनियमानुसार कराची आकारणी होणार आहे. त्यामुळे यापुढे निविदा सादर करताना दिनांक १ जुलै २०१७ नंतर लागू झालेल्या जीएसटीच्या कराच्या बोज्याचा विचार करुनच निविदा सादर करण्याबाबत स्पष्ट निर्देश कंत्राटदारास देण्यात यावेत. त्याबाबतचे कलम निविदेत समाविष्ट करावे.

२) <u>दिनांक २२ ऑगस्ट २०१७ पूर्वी स्विकृत करण्यात आलेल्या निविदा मात्र कंत्राटाकरिता Work Order अद्याप न दिलेली कंत्राटे</u> :

दिनांक २२ ऑगस्ट २०१७ पूर्वी निविदा स्विकृत करण्यात आल्या आहेत, परंतु त्याबाबत कार्यारंभ आदेश (work order) देण्यात आलेले नाहीत अशा प्रकरणांमध्ये निविदा प्रक्रियेमध्ये कंत्राटदाराने जीएसटीपूर्व कराच्या बोज्याचा विचार करुन निविदा दाखल केली असल्याने जीएसटीनंतरच्या कराच्या बोज्याचा त्यामध्ये विचार झाला नाही असे गृहित धरुन सर्व निविदा रद्द करण्यात याव्यात व पुन:श्च short tender notice देवून निविदा प्रक्रिया करण्यात यावी. तथापि, अतितात्काळ स्वरुपांच्या कामांबाबतच्या उदाहरणार्थ (रस्त्यावरील खड्डे भरणे) निविदांची प्रक्रिया पूर्ण करण्यात येवून त्यांचे कार्यारंभ आदेश देण्यात यावेत. मात्र सदर निविदा स्वीकृत करताना जीएसटी अंतर्गत येणाऱ्या कराचा बोजा लक्षात घेवून कंत्राटदारांशी वाटाघाटी करुन दर कमी करण्याचा प्रयत्न करण्यात यावा.

३) <u>दिनांक १ जुलै २०१७ पूर्वी स्विकृत करण्यात आलेली निविदा व दिनांक १ जुलै २०१७ नंतर कंत्राटाकरिता work order देण्यात आलेली कंत्राटे :</u>

दिनांक १ जुलै २०१७ पूर्वी जारी करण्यात आलेली निविदा व दिनांक १ जुलै २०१७ नंतर कंत्राटाकरिता work order देण्यात आली असेल त्या प्रकरणांमध्ये कंत्राट रद्द करण्यात येवू नये व कंत्राटाचे काम कंत्राटदारास सुरु करण्याचे निर्देश देण्यात यावेत. जीएसटीच्या अंमलबजावणी कराच्या बोज्यामध्ये होणाऱ्या बदलामुळे कंत्राटाच्या किंमतीत बदलाबाबत विधी व न्याय विभागाचे अभिप्राय स्वतंत्रपणे घेण्यात येत आहेत. सदर अभिप्राय प्राप्त झाल्यानंतर करावयाच्या कार्यवाहीची माहिती संबंधितांना कळविण्यात येईल.

४) <u>दिनांक १ जुलै २०१७ ते २१ ऑगस्ट २०१७ पर्यंत जारी करण्यात आलेल्या निविदा</u> :

दिनांक १ जुलै २०१७ ते २१ ऑगस्ट २०१७ पर्यंत जारी केलेल्या निविदाबाबत जर work order देण्यात आलेली नसेल तर उपरोक्त मुद्दा क्र.२ प्रमाणे कार्यवाही करावी व जर work order देण्यात आली असेल तर मुद्दा क्र.३ प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

५) <u>दिनांक १ जुलै २०१७ पूर्वी स्विकृत करण्यात आलेल्या निविदा व ज्यामध्ये दिनांक १ जुलै २०१७ पूर्वी काही काम झाले आहे व दिनांक १ जुलै २०१७ नंतर काही काम होणे अपेक्षित आहे (Ongoing Contract)</u> :

दिनांक १ जुलै २०१७ पूर्वीच्या कंत्राटामध्ये काही काम दिनांक १ जुलै २०१७ पूर्वी पूर्ण झाले आहे व काही काम दिनांक १ जुलै २०१७ नंतर होणे अपेक्षित आहे, त्या कंत्राटामध्ये -

**(अ)** दिनांक १ जुलै २०१७ पूर्वी पूर्ण झालेले काम व त्याबाबत दिनांक १ जुलै २०१७ पूर्वी प्राप्त झालेल्या देयकावर पूर्वीच्या पध्दतीप्रमाणे, म्हणजेच VAT प्रमाणे कार्यवाही करावी.

**(ब)** दिनांक १ जुलै २०१७ पूर्वी पूर्ण झालेले काम व त्याबाबत दिनांक १ जुलै २०१७ नंतर प्राप्त झालेल्या देयकावरही पूर्वीच्या पध्दतीप्रमाणे, म्हणजेच VAT प्रमाणे कार्यवाही करावी.

**(क)** दिनांक १ जुलै २०१७ नंतर करण्यात येणाऱ्या कामाबाबत काम सुरु ठेवण्यात यावे तसेच देयकेही अदा करण्यात यावीत. अशा कामासंदर्भात द्यावयाच्या देयकामध्ये जीएसटी अंमलबजावणीमुळे होणाऱ्या कराच्या बोज्यात होणाऱ्या बदलाबाबत विधी व न्याय विभागाचे अभिप्राय स्वतंत्रपणे घेण्यात येत आहेत. सदर अभिप्राय प्राप्त झाल्यानंतर त्याप्रमाणे करावयाच्या कार्यवाहीची माहिती संबंधितांना कळविण्यात येईल.

६) <u>शासकीय कंत्राटावर असलेले टीडीएसचे प्रावधान</u> :

**अ.** दिनांक १ जुलै २०१७ पूर्वी पूर्ण झालेले काम व त्याबाबत दिनांक १ जुलै २०१७ पूर्वी प्राप्त झालेल्या देयकाबाबत VAT प्रमाणे टीडीएसची रक्कम वजा करण्यात यावी व त्याचा भरणा शासकीय तिजोरीत करण्यात यावा.

**ब.** दिनांक १ जुलै २०१७ पूर्वी पूर्ण झालेले काम व त्याबाबत दिनांक १ जुलै २०१७ नंतर प्राप्त झालेल्या देयकाबाबत VAT प्रमाणे टीडीएसची वजावट करण्यात यावी व त्याचा भरणा शासकीय तिजोरीत करण्यात यावा.

**क.** दिनांक १ जुलै २०१७ नंतर करण्यात येणाऱ्या कामासंदर्भात देय रकमेतून २ टक्के टीडीएस (१% सीजीएसटी + १% एसजीएसटी) वजा करुन त्याचा भरणा शासकीय तिजोरीत करणे अभिप्रेत आहे. सदर वजावट करण्याबाबतचे प्रावधान महाराष्ट्र वस्तू व सेवा कर अधिनियमातील कलम ५१ मध्ये करण्यात आले आहे. मात्र, सदर प्रावधान अद्याप अंमलात आले नसल्याने त्याची वजावट, सदरचे कलम अंमलात येईपर्यंत टीडीएस करण्याची आवश्यकता नाही.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संकेतांक २०१७०८२१११०८४६८००५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Dattatraya Bhagat

Digitally signed by Rajendra Dattatraya Bhagat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=332409337d66e27e26c709ba075238b76a2b06f6faffdd035e289bd979cbc844, serialNumber=dab085af545320ae1f04b79f7b024042711c4e23563f67e02ec2daacb3db2c83, cn=Rajendra Dattatraya Bhagat
Date: 2017.08.21 10:59:42 +05'30'

**(रा.द. भगत)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव/सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सहसचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती, कराधान-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.